सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत (माहे जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर २०२१ वेतन).

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०२१/प्र.क्र.६०/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ नोव्हेंबर, २०२१

**वाचा :** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, अनुक्रमे दि. ०६/०४/२०२१,
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१.
३) शासन निर्णय समक्रमांक दि.२२ जुलै, २०२१.
४) अर्थ सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे अनुक्रमे क्र. कार्यासन-९, रानिवि/निरंक/२०४, दि.०७/०७/ २०२१ व क्र.कार्यासन-९, रानिवि/१५२४-१५२५, दि.२७.०७.२०२१.

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्रमांक एक च्या शासन परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२१ यांच्या अनुसूचीतील स्तंभ ४ मध्ये निर्दिष्ठ करण्यात आलेल्यास (रकमांसह)विधान मंडळाने मंजूरी दिली असून, महाराष्ट्राच्या माननीय राज्यपालांनी सुध्दा त्यास अधिसंमती दिलेली आहे. हा अधिनियम महाराष्ट्र अधिनियम क्र. १५ म्हणून महाराष्ट्र असाधारण राजपत्र भाग-४ मध्ये दि. १५ मार्च, २०२१ रोजी प्रसिध्द करण्यात आलेला आहे.

२. विभागाच्या अर्थसंकल्पीय शाखेने ३६ सहायक अनुदान (वेतन) या प्रयोजनासाठी ५ % इतके अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिल्याने मंडळाचा माहे जून, २०२१ या महिन्याचा वेतन, सेवानिवृत्तीवेतन इ. वरील खर्च भागविण्यासाठी विभागाच्या दि. २२ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये रुपये ६२२.०३ लक्ष (रुपये सहा कोटी बावीस लाख तीन हजार मात्र) इतके अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

३. आता संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधि वितरण/ खर्चाची मर्यादा ७५ % इतकी विहित करण्यात आली आहे. उक्त शासन निर्णयास अनुसरुन उद्योग विभागाच्या अर्थसंकल्पीय शाखेने एकूण वार्षिक तरतुदीच्या ७५ टक्क्याच्या मर्यादेत रक्कम अर्थ संकल्पीय वितरण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध करुन दिली आहे.

४. आता अर्थसंकल्पीय शाखेने ३६ सहायक अनुदान (वेतन) या प्रयोजनासाठी अतिरिक्त ७५% तरतूद उपलब्ध करुन दिली असल्याने मंडळाचा माहे जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर, २०२१ या महिन्याचा वेतन, सेवानिवृत्तीवेतन इ. वरील खर्च भागविण्यासाठी अनुदान उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

खादी व ग्रामोद्योग मंडळाचा माहे जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर, २०२१ या महिन्याचा वेतन, सेवानिवृत्ती वेतन, अंशदानावरील खर्च भागविण्यासाठी ३६ सहाय्यक अनुदान (वेतन) या उद्दिष्टांसाठी रुपये १८,६६,०९,०००/- (रुपये अठरा कोटी सहासष्ट लाख नऊ हजार मात्र) इतके अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०५ खादी व ग्रामोद्योग (००) (००) (०१) खादी व ग्रामोद्योग मंडळाला सहाय्यक अनुदान (दत्तमत) (२८५१ ०५८५) ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) ) या उद्दिष्टांखालील सन २०२१-२२ या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र मंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे मंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३० / २०१३/ विनियम, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८- भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११२०११४५१२३७५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA SHAILESH PATIL

Digitally signed by VARSHA SHAILESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f4b67cdbf4f6545e41c8901556eff639761ce84cbd3ad817e8a3fcf2b3081d9a, pseudonym=2D4B545C1769DC79E9D54995D4562527A340F9A3, serialNumber=DCE65ED23B27ACDA9F875C49AB28E9E933B70F0889E28F3A284173491AD1D6A6, cn=VARSHA SHAILESH PATIL
Date: 2021.12.01 14:55:06 +05'30'

**( वर्षा सावंत- पाटील )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

**माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१ विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.

२ मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.

३ अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.

४ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

५ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

६ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८ वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.

९ लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)

१० कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुं-३२

११ कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२ निवड नस्ती (उद्योग-६).

*********